औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयातील परिविक्षाधीन उप संचालक गट-अ यांचा परिविक्षा कालावधी समाप्त करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, उर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः औसुवआ-१११४/प्र.क्र.६५/काम-१**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: १६ मे, २०१५.

**संदर्भ:-**

१) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र.एफडीई-११/२००९/ प्र.क्र. ३८२/कामगार-१ दिनांक २२/०५/२०१२.

२) उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. एफडीई-११/२००९/ प्र.क्र. ३८२/कामगार-१ दिनांक २४/०७/२०१२.

३) औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाकडील पत्र क्र. संऔसुवआ/ आस्थापना/४८४०/२ब दिनांक १७/०३/२०१५.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र.१) येथील शासन निर्णयान्वये एकूण ९ उमेदवारांची व संदर्भ क्र. २) येथील शासन निर्णयान्वये एकूण ३ उमेदवारांची अशाप्रकारे एकूण १२ उमेदवारांची परिविक्षाधीन उपसंचालक म्हणून औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवर नियुक्ती करण्यात आली आहे. त्यापैकी एकूण ९ अधिकारी कर्तव्यावर रुजू झाले आहेत. सदर अधिका-यांचे परिविक्षा कालावधी समाप्त करण्यासाठी आवश्यक असणारे परिपूर्ण प्रस्ताव संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय यांचे कडून संदर्भ क्र.३) येथील पत्रान्वये प्राप्त झाले आहेत. त्यानुषंगाने उक्त ९ परिविक्षाधीन उपसंचालकांचा परिविक्षा कालावधी समाप्त करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाच्या आस्थापनेवर उप संचालक, गट-अ, या पदावर सरळसेवेने नियुक्ती करण्यासाठी महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून शिफारस करण्यात आलेल्या एकूण १२ उमेदवारांपैकी ९ उमेदवारांना संदर्भाधीन शासननिर्णयान्वये २ वर्षाच्या परिविक्षा कालावधीवर, परिविक्षाधीन अधिकारी म्हणून नियुक्ती देण्यात आलेली आहे. सदर उमेदवारांपैकी ९ उमेदवारांची मूल्यांकन अहवालासह परिपूर्ण माहिती औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालयाकडून प्राप्त झाली आहे. उपरोक्त नियुक्ती आदेशातील अटीनुसार २ वर्षाचा परिविक्षा कालावधी समाधानकारकरित्या पूर्ण केलेल्या खालील उमेदवारांचा परिविक्षा कालावधी त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या दिनांकापासून समाप्त करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. त्यानुसार सदर दिनांकापासून उक्त अधिका-यांना उपसंचालक पदावर नियमित नियुक्ती देण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिका-याचे नाव व पद | परिविक्षा कालावधी सुरु दिनांक | परिविक्षा कालावधी समाप्त दिनांक | रजा कालावधी (असल्यास) एकूण दिवस | नियमित नियुक्ती दिनांक |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ |
| १. | श्री. सु.अ.शिंदे | ०१/०६/२०१२ | ०८/०६/२०१४ | ०८ दिवस | ०९/०६/२०१४ |
| २. | श्री. ज.पं.मोहरकर | २२/०६/२०१२ | २१/०६/२०१४ | -- | २२/०६/२०१४ |
| ३. | श्रीमती. अं.छ.आडे | ०८/०८/२०१२ | १३/०८/२०१४ | ०६ दिवस | १४/०८/२०१४ |
| ४. | श्री. अ.मो.अवसरे | ०६/०६/२०१२ | ११/०६/२०१४ | ०६ दिवस | १२/०६/२०१४ |
| ५. | श्री. प्र.वि.सुरसे. | १९/०६/२०१२ | १८/०६/२०१४ | -- | १९/०६/२०१४ |
| ६. | श्री. सं.ज.गिरी. | १२/०६/२०१२ | ०६/०७/२०१४ | २५ दिवस | ०७/०७/२०१४ |
| ७. | श्री. इ.श.खान. | २५/०५/२०१२ | ३१/०५/२०१४ | ०७ दिवस | ०१/०६/२०१४ |
| ८. | श्री. वि.ब.घोगरे. | १८/०६/२०१२ | १७/०६/२०१४ | -- | १८/०६/२०१४ |
| ९. | श्री. अ.अ.घोगरे. | २१/०८/२०१२ | २०/०८/२०१४ | -- | २१/०८/२०१४ |

२. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई यांनी सर्व संबंधितांना कळवून उपरोक्त अधिका-यांच्या सेवा पुस्तकात योग्य ती नोंद घेण्याची कार्यवाही करावी.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०५१८१६४६३६६०१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Khavnekar Jayashree A

Digitally signed by Khavnekar Jayashree A
DN: CN = Khavnekar Jayashree A, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Industry energy & labour department
Date: 2015.05.18 16:47:41 +05'30'

**(ज. आ. खवणेकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, ७ वा मजला, प्लॉट नं.सी-२०,ब्लॉक नं.ई, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा, (पुर्व), मुंबई ४०० ०५१.

**प्रत,**

१. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई.
२. महालेखापाल, महाराष्ट्र१/२, मुंबई/नागपूर.
३. निवासी लेखाधिकारी, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

५. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.

६. सर्व अपर संचालक / सहसंचालक / उपसंचालक /सर्व संबंधित अधिकारी, द्वारा:- संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, कामगार भवन, ५ वा मजला, प्लॉट नं.सी-२०, ब्लॉक नं.ई, बांद्रा-कुर्ला संकुल, बांद्रा, (पुर्व), मुंबई -५१.

७. सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.

९. मा. मंत्री (कामगार) यांचे खाजगी सचिव.

१०. प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहायक.

११. निवड नस्ती ( कामगार-१)